**अतिवृष्टी व पूरामुळे बाधित झालेल्या कुटुंबांना अन्नधान्य वितरीत करण्याबाबतची कार्यपद्धती.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः अधापु-२०२४/प्र.क्र.१३/नापु-२२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०५ जून, २०२४

**वाचा:-**

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. सीएलएस-२०१८/प्र. क्र.१२५/ म-३, दि.८.३.२०१९.
२) Ministry of Consumer Affairs, Food and Public Distribution, Government of India, यांचे पत्र क्र. १-५/२०१३-BP-III, दि. २२.०८.२०१७.
३) शासन परिपत्रक अ.ना.पु. व ग्रा.सं.वि. क्रमांकः अधापु-२०१९/ प्र. क्र. १०५/ नापु-२२, दि. ७ ऑगस्ट, २०१९.

**प्रस्तावना :-**

अतिवृष्टी व पूरामुळे आपत्कालीन परिस्थिती उद्भवून निराधार होणाऱ्या कुटुंबांना प्रति कुटुंब १० किलो गहू व १० किलो तांदूळ मोफत पुरविण्यास संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयान्वये शासनाने मान्यता दिली आहे. अतिवृष्टी व पूर यांसारख्या आपत्कालीन परिस्थितीत अतिवृष्टी व पूरामुळे बाधित झालेल्या कुटुंबांना अन्नधान्य कशाप्रकारे वितरीत करावे, अन्नधान्याकरीता आवश्यक असलेला निधी महसूल विभागाकडून कोणत्या दराने प्राप्त करून घ्यावा, याबाबतची कार्यपद्धती सर्व संबंधितांना कळविण्याच्या अनुषंगाने पुढील सूचना देण्यात येत आहेत :-

**शासन परिपत्रक :-**

अतिवृष्टी व पूरामुळे बाधित झालेल्या कुटुंबांना अन्नधान्य वितरीत करणे व सदर अन्नधान्याची प्रतिपूर्ती केंद्र शासनाकडून करून घेणे, याकरीता पुढीलप्रमाणे कार्यपद्धती अवलंबविण्यात यावी:

१) महसूल व वन विभागाच्या दि.८.३.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार अतिवृष्टी व पूर परिस्थिती निर्माण झाल्याचे संबंधित जिल्हाधिकारी यांनी जाहीर करावे. (घोषणापत्र/ अधिसूचना निर्गमित करावी).

२) जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी/ उप नियंत्रक यांनी जिल्हास्तरावरील महसूल विभागाकडून अतिवृष्टी/पूरामुळे बाधित झालेल्या कुटुंबांची संख्या, त्यांना आवश्यक असणारे गहू व तांदळाचे प्रमाण, बाधित कुटुंबांची यादी, बाधित झालेल्या एकूण व्यक्तींपैकी राष्ट्रीय अन्नसुरक्षा योजनेतील लाभार्थी (NFSA beneficiaries) व non NFSA लाभार्थ्यांची संख्या, इ. आवश्यक बाबी प्राप्त करून घ्याव्यात.

३) सदर अन्नधान्याचे वाटप जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उप नियंत्रक यांनी त्यांच्याकडे लक्ष निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत शिल्लक असलेल्या अन्नधान्यामधून तात्काळ करावे.

४) महसूल व वन विभागाच्या क्रमांक : सीएलएस-२०१८/ प्र. क्र. २२५/ म-३, दि. ८.३.२०१९ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार सदर अन्नधान्य आपत्कालीन परिस्थिती उद्भवल्यानंतर एक आठवड्यात वाटप करावयाचे असल्याने सदर वाटप पूर्ण झाल्यानंतर वाटप केलेल्या अन्नधान्याएवढ्या अन्नधान्याची अतिरिक्त मागणी जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उप नियंत्रक यांनी तात्काळ शासनाकडे करावी.

५) अन्नधान्याची मागणी शासनाकडे करतेवेळी जिल्हाधिकारी यांच्याकडून घोषित करण्यात आलेले घोषणापत्र/अधिसूचना शासनास सादर करावी.

६) सदर अन्नधान्यासाठी आवश्यक असलेला निधी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि.१८.८.२०१७ च्या पत्रामध्ये नमूद केलेल्या दराने (MSP/ MSP derived rate) जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उप नियंत्रक यांनी जिल्हास्तरावरील महसूल विभागाकडून तात्काळ उपलब्ध करून घ्यावा.

७) राज्य शासनाकडून केंद्र शासनाकडे सदर अन्नधान्याची मागणी केल्यानंतर व त्या अन्नधान्यास केंद्र शासनाची मंजूरी प्राप्त झाल्यानंतर त्या मंजूरी आदेशांच्या आधारे जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उप नियंत्रक यांनी भारतीय अन्न महामंडळाकडे प्रचलित MSP/ MSP derived rate ने रकमा जमा करून अन्नधान्याची उचल करून अतिवृष्टी / पूर परिस्थिती मध्ये वाटप केलेल्या अन्नधान्याचे समायोजन करावे.

८) अतिवृष्टी / पूरग्रस्तांना वाटप केलेल्या अन्नधान्याचा तपशील, महसूल विभागाकडून अन्नधान्याकरीता प्राप्त झालेल्या रकमा, भारतीय अन्न महामंडळाकडे प्रचलित MSP/ MSP derived rate ने जमा केलेल्या रकमा, अन्नधान्याचे समायोजन केलेल्या अन्नधान्याचा तपशील, बाधित झालेल्या एकूण व्यक्तींपैकी NFSA व non-NFSA लाभार्थ्यांचा तपशील, जिल्हाधिकारी यांच्याकडून घोषित करण्यात आलेले घोषणापत्र/अधिसूचना याबाबतची माहिती नापु-२२ कार्यासनास तसेच वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांना तात्काळ कळवावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०६०५१२२३२५२१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2024.06.05 12:36:29 +05'30'

**( पूजा मानकर )**
**शासनाच्या अवर सचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१२. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१३. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१४. सर्व उपायुक्त (पुरवठा)
१५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१६. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१७. सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१८. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१९.सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२३. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
२४. सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२५.निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).